**सार्वजनिक बांधकाम विभागातील दिनांक २९ जून २०१७ ते दिनांक १९ सप्टेंबर २०१७ या कालावधीत मागविण्यात आलेल्या निविदांसाठी Price Variation Clause नुसार देय रक्कम सानुग्रहाच्या स्वरुपात प्रदान करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्र. बीडीजी-२०१८/प्र.क्र. १४१/इमा-२**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १८ डिसेंबर, २०१८

वाचा :- १. शासन निर्णय क्र. सीएटी २०१७/प्र. क्र. ८/ इमा-२, दि. १२/०४/२०१७
२. शासन निर्णय क्र. सीएटी २०१७/प्र. क्र. ८/ इमा-२, दि. २९/०६/२०१७
३. शासन परिपत्रक क्र. संकिर्ण-२०१७/प्र.क्र. १२१(भाग-२)/इमा-२, दि.१९/०९/२०१७
४. शासन परिपत्रक क्र. संकिर्ण-२०१७/प्र.क्र.१२१(भाग-२)/इमा-२, दि.२३/१०/२०१७
५. महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका सहावी आवृत्ती -१९८४

**प्रस्तावना :-**

दिनांक १२/०४/२०१७ च्या शासन निर्णयाव्दारे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या ई-निविदा प्रक्रियेअंतर्गत एकत्रित सुधारीत सूचना निर्गमित करण्यात आल्या होत्या. या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.२.१० नुसार " ज्या कामांना १०० टक्के तरतूद उपलब्ध असेल अशा कामांना भाववाढीचे कलम लागू राहणार नाही" ही बाब अंतर्भूत करण्यात आली होती. दिनांक २९ जून २०१७ रोजी दि.१२ एप्रिल २०१७ च्या शासन निर्णयास शुध्दीपत्रक निर्गमित करण्यात आले. सुधारीत Standard Bidding Document मध्ये Price variation ची बाब पूर्णपणे वगळण्यात आली. त्यानंतर दि. २३ ऑक्टोबर २०१७ च्या परिपत्रकान्वये Price variation साठी Petrol, Oil and lubricants, bitumen, steel व cement साठी सुधारीत Price variation clause अंतर्भूत करण्याच्या सूचना निर्गमित करण्यात आल्या व Price variation ची रक्कम स्विकृत निविदा रकमेच्या ५% पर्यंत सिमीत करण्याच्याही सूचना निर्गमित करण्यात आल्या. तसेच सदरचे Price variation clause हा एक वर्षापेक्षा जास्त कालावधीच्या कामांसाठी लागू असल्याची बाब स्पष्ट करण्यात आली होती.

दिनांक २९ जून २०१७ ते दिनांक १९ सप्टेंबर २०१७ या कालावधीत मागविण्यात आलेल्या ज्या निविदेमध्ये Price variation clause अंतर्भूत करण्यात आलेला नव्हता अशा कामाच्या कंत्राटदारांनी सदरची बाब अन्यायकारक असून त्यामुळे आर्थिक नुकसान होत असल्याचे नमूद करुन, अशा कामांनाही दिनांक २३ ऑक्टोबर २०१७ च्या शासन निर्णयाप्रमाणे Price variation clause लागू करण्याची मागणी केली आहे. उपरोक्त सर्व पार्श्वभूमी विचारात घेऊन, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.२३३ मधील कंत्राटाच्या नियमांपासून विचलनाबाबत असलेल्या तरतुदीनुसार शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

दि. २९ जून २०१७ ते दि.१९ सप्टें.२०१७ या कालावधीत मागविण्यात आलेल्या निविदांच्या अटी व शर्तीमध्ये Price variation clause नसल्यास अशा कामांच्या कंत्राटदारास Price variation clause नियमानुसार देय असलेली रक्कम सानुग्रह प्रदानाच्या स्वरुपात देण्यास खालील अटी व शर्तीच्या आधारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१. कंत्राटदाराला आलेला प्रत्यक्ष तोटा कागदोपत्री पुराव्यानिशी सिध्द झालेल्या असावा आणि कंत्राटदाराने त्याला आलेल्या प्रत्यक्ष तोटयाच्या पुष्टयर्थ सर्व कागदोपत्री पुरावे व सर्व अभिलेख सादर करावेत.

२. ज्या तोटयास कंत्राटदाराला जबाबदार धरले असेल असा तोटा सानुग्रह पात्र बाबतीत धरु नये.

३. कंत्राटदाराने कार्यक्षमतेने काम केलेले असून योग्य काटकसर केलेली असल्याबाबत व पैश्याचा अपव्यय होईल अशा कामाच्या पध्दती टाळल्या असल्याबाबत विभागाने खात्री करुन घ्यावी.

४. कोणत्याही प्रकरणात देण्यात येणारी नुकसान भरपाईची रक्कम कंत्राटदाराला आलेल्या प्रत्यक्ष तोटयाच्या रकमेपेक्षा अधिक होता कामा नये.

५. कंत्राटदाराच्या संपूर्ण क्षमतेचा वापर करण्यात आला असेल व निविदेच्या विहीत कालावधीत कामे झाली असतील अशीच प्रकरणे सानुग्रह प्रदान देण्यासाठी विचारात घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेत क्र. २०१८१२१८१५२०५६०२१८ असा आहे . हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Sachin Manikrao Chivate

Digitally signed by Sachin Manikrao Chivate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e51dff58ad80dfdae3976edee46d1bf7934d01469cb4d916976c25305666b613, serialNumber=40ae84322c80d3e4ea1b574eb3782ed6cb133b938933bdf197ed5a1551d8622a, cn=Sachin Manikrao Chivate
Date: 2018.12.18 15:29:10 +05'30'

**(सचिन चिवटे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत --**

१. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
२. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.
४. प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
५. महालेखापाल, (लेखापरिक्षा),महाराष्ट्र-१, मुंबई.
६. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र-१, मुंबई.
७. महालेखापाल, (लेखापरिक्षा),महाराष्ट्र-२, नागपूर.
८. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र-२, नागपूर.
९. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई.
११. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.
१२. सर्व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ.
१३. सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.
१४. सार्वजनिक बांधकाम विभाग, कार्यासन इमारती-१,२,३ , मंत्रालय, मुंबई.